**शासन इंडिया वॉटर वीक (भारत जलसप्ताह ) या कार्यक्रमासाठी जलसंपदा विभागाच्या अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीडीए १०१४/(२१२/१४)/लाक्षेवि(कामे)**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
तारीख: : ०९ जानेवारी , २०१५

**<u>प्रस्तावना</u>**

केंद्र शासनाच्या जलसंपदा मंत्रालयामार्फत दरवर्षी “भारत जलसप्ताह” हा कार्यक्रम नवी दिल्ली येथे आयोजित करण्यात येतो. सदर कार्यक्रमात महाराष्ट्र शासन दरवर्षी सहभागी होत आहे. सदर कार्यक्रमासाठी जलसंपदा विभागातील अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता / उप अभियंता / शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता यांच्यापैकी साधारण १० ते १२ अभियंत्यांची निवड शासना मार्फत करण्यात येते. सदर कार्यक्रमाच्या अनुषंगाने या अधिकाऱ्यांचा अनुषंगिक खर्च शासनामार्फत करण्यात येतो.

या कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी क्षेत्रिय स्तरावरुन परवानगी देण्याबाबत कोणतेही आदेश नाहीत. उपरोक्त प्रमाणे निवड करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कार्यकारी अभियंता / उप अभियंता / शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता अशा होतकरु व अभ्यासू अभियंत्यांना भारतातील इतर राज्यात होणाऱ्या सिंचन विषयक बाबींचा अभ्यास करण्यासाठी व महाराष्ट्राचा अनुभव इतर राज्यांना देण्याच्या उद्देशाने वैयक्तिक पातळीवर उपस्थित राहण्याची परवानगी देण्याचे अधिकार काही अटींच्या अधीन राहून क्षेत्रिय स्तरावरील अधीक्षक अभियंता यांना देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन परिपत्रक**

केंद्र शासनाच्या जलसंपदा मंत्रालयामार्फत दरवर्षी आयोजित करण्यात येणाऱ्या “भारत जलसप्ताह” या कार्यक्रमासाठी शासनामार्फत निवड करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कार्यकारी अभियंता / उप अभियंता / शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता अशा होतकरु व अभ्यासू अभियंत्यांना भारतातील इतर राज्यात होणाऱ्या सिंचन विषयक बाबींचा अभ्यास करण्यासाठी व महाराष्ट्राचा अनुभव इतर राज्यांना देण्याच्या उद्देशाने वैयक्तिक पातळीवर उपस्थित राहण्याची परवानगी देण्याचे अधिकार अधीक्षक अभियंता यांना खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहेत

१) सदर कार्यक्रमासाठी आवश्यक असलेले नोंदणी शुल्क हे इच्छुक असणाऱ्या अभियंता यांनी स्वत: भरावे.
२) सदर कार्यक्रमासाठी असलेला कालावधी हा सदर कार्यक्रमात भाग घेणाऱ्या इच्छुक उमेदवारांसाठी कर्तव्य कालावधी म्हणून समजण्यात येईल व त्यांना प्रवास भत्ता व दैनिक भत्ता शासनाकडून अनुज्ञेय असेल.
३) अधीक्षक अभियंता यांनी अशी परवानगी दिलेल्या अधिकाऱ्यांची नावे अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय,पुणे यांना कळवावीत.
४) सहभागी अधिकारी सर्व साधारणपणे अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांच्या निर्देशानुसार काम करतील.

५) सहभागी अधिकारी यांनी त्यांचा अनुभव, अहवाल, शिफारशी अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांना कळवावा.सूचीचा मजकूर लिहा.

अधीक्षक अभियंता / मुख्य अभियंता यांना या कार्यक्रमास उपस्थित राहवयाचे असल्यास त्यांनी त्यांच्या लगतच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची परवानगी घ्यावी.सूचीचा मजकूर लिहा.

अधीक्षक अभियंता यांनी जलसंपदा विभागातील तरूण सहाय्यक अभियंता (श्रेणी-२) यांना सुध्दा पाण्याविषयीच्या प्रश्नांची पूर्णत: जाणिव करून घेता यावी व आंतरराष्ट्रीय जलतज्ञांबरोबर विचारांची देवाण घेवाण करता यावी या हेतूने आपल्या अधिनस्त १ किंवा २ सहाय्यक अभियंता (श्रेणी-२) यांना सदर कार्यक्रमास उपस्थित राहण्याकरिता उद्युक्त करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०९१५५९२८५८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samadhan Kondiba Sabbinwar

Digitally signed by Samadhan Kondiba Sabbinwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Superintendent Engineer And Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samadhan Kondiba Sabbinwar
Date: 2015.01.09 17:28:39 +05'30'

**स.कों.सब्बीनवार**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
२) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
३) महालेखापाल- १/२ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
४) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
५) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग. यांनी आपला अखत्यारीतील कार्यकारी अभियंता/ उप अभियंता/शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता यांना आपल्या स्तरावर कळविण्याची विनंती आहे.
८) सर्व कोषागार अधिकारी
९) निवड नस्ती / लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ